मग्रारोहयो अंतर्गत अनुदान पध्दतीने
शेततळी हाती घेणेबाबत-
राज्यात प्रत्येक वर्षी प्रति तालुका २००
शेततळी याप्रमाणे ५ वर्षाचे उद्दिष्ट -

महाराष्ट्र शासन,
नियोजन विभाग,
शासन निर्णय क्रमांक- शेतत- २००९/प्र.क्र.२७१/रोहयो-५,
मंत्रालय,मुंबई- ४०० ०३२.
दिनांक ३१ ऑगस्ट, २००९.

**प्रस्तावना :-**

राज्यातील पर्जन्यावर आधारित कोरडवाहू शेतीची पाणलोट व जलसंवर्धन माध्यमातून जलसिंचन उपलब्धता वाढविण्यासाठी, मग्रारोहयो अंतर्गत वैयक्तिक लाभार्थी योजनेच्या धर्तीवर (जवाहर विहिर व फलोत्पादन योजना) अनुदान पध्दतीने शेततळी घेण्याची योजना हाती घेण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्या संदर्भात शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय :-**

राज्यातील पर्जन्यावर आधारित कोरडवाहू शेतीची पाणलोट व जलसंवर्धन माध्यमातून जलसिचन उपलब्धता वाढविण्यासाठी, मग्रारोहयो अंतर्गत वैयक्तिक लाभार्थी योजनेच्या धर्तीवर (जवाहर विहिर व फलोत्पादन योजना) अनुदान पध्दतीने शेततळी घेण्याची योजना हाती घेण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे. त्यासाठी राज्यात प्रत्येक वर्षी प्रति तालुका २०० शेततळी (मुंबई शहर व जिल्हा वगळून ) याप्रमाणे संपूर्ण राज्यात प्रत्येक वर्षी ७०४०० शेततळयांचे उद्दिष्ट या शासन निर्णयाव्दारे मंजूर करण्यात येत आहे. पुढील ५ वर्षांपर्यंत ही योजना अनुदान पध्दतीवर राबविण्यात येणार आहे.

२. मग्रारोहयो अंतर्गत शेततळयांच्या योजनेचे अटी, शर्ती, लक्षीत लाभार्थी, लाभार्थी निवडीची पध्दत, आर्थिक मापदंड इत्यादिबाबत अलगरित्या सविस्तर सूचना निर्गमित करण्यात येत आहेत.

३. यासाठी होणारा खर्च सन २००९-१० च्या विभागाच्या उपलब्ध तरतूदीतून भागविण्यात येईल.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.govt.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला आहे. त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २००९०९०११३५४३६००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( वि. मा. बगाडे )
उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,
१. मुख्यमंत्र्यांचे सचिव, ९५१

२. सर्व मंत्री यांचे खाजगी सचिव
३. सर्व राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव
४. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन
५. प्रधान सचिव, (जलसंधारण) व (रोहयो), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
६. प्रधान सचिव, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय , मुंबई
७. सचिव, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई
८. सर्व विभागीय आयुक्त,
९. आयुक्त, (कृषी) महाराष्ट्र राज्य, पुणे
१०. सर्व जिल्हाधिकारी (मुंबई शहर व उपनगर जिल्हा वगळून)
११. सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (मुंबई शहर व उपनगर जिल्हा वगळून)
१२. उप सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ (रोहयो समिती)
१३. संचालक, भू-जल सर्वेक्षण विकास यंत्रणा, महाराष्ट्र राज्य, पुणे
१४. सर्व विशेष कार्य अधिकारी (रोहयो), विभागीय आयुक्तांचे कार्यालय
१५. विशेष कार्य अधिकारी (मग्रारोहयो), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
१६. सर्व उप जिल्हाधिकारी (रोहयो) जिल्हाधिकारी कार्यालय (मुंबई शहर व उपनगर जिल्हा वगळून)
१७. सर्व उप सचिव (रोहयो) , नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
१८. सर्व अवर सचिव व कक्ष अधिकारी (रोहयो प्रभाग), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
१९. निवड नस्ती, (रोहयो -५)